# या गीतार्थाची थोरी

लेखक : **अविनाश महादेव नगरकर**

nagarkaram@yahoo.com

18 Amaretto, Mission Height, Flat bush

Auckland 2019, New Zealand

फोन नंबर .00649 2714534

प्रकाशक :**ई साहित्य प्रतिष्ठान**

www.esahity.com

esahity@gmail.com

प्रकाशन :७ मार्च २०१६ (महाशिवरात्री)

## ||श्रीगुरु:शरणं||

संपूर्ण जगदेव नंदनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमा: गाङ्गंवारि

समस्तवारिनिवहा: पुण्या समस्ता:क्रिया: |

वाच: संस्कृतप्राकृत: श्रुतिशिरो वाराणसी मेदिनी

सर्वावास्थितिरस्य वस्तूविषया दृष्टे परब्रह्मणि ||



हे परब्रह्मरुपी सद्गुरो, आपल्यासाठी संपूर्ण विश्व म्हणजे एक नंदनवनच आहे. सर्व वृक्ष आपणास कल्पवृक्षच आहेत. सर्व जलाशय गंगा आहेत व आपल्या सर्व क्रिया अत्यंत पवित्र आहेत. आपली वाणी संस्कृत असो कीं प्राकृत ती मला वेदासम शिरोधार्य आहे. सर्व भूमी आपल्यासाठी वाराणसीच आहे. कारण आपण सदैव ब्रह्मभावात असता.

अनंत कोटी ब्रह्मांडनायक भगवान योगीराज सद्गुरू
वामनरावजी गुळवणी महाराजांचे वर्णन श्रीमद् आद्य
शंकराचार्यांच्या या सुयोग्य शब्दांखेरीज करताच येत
नाही. त्यांनी घडवलेली हि कलाकृती त्यांच्याच चरणी
सादर समर्पण .

# या गीतार्थाची थोरी



# श्रीमद्भगवद्गीते विषयी
# लेख १ ला

भगवद्गीतेविषयी फेसबुकवर बऱ्याच पोस्ट्स येऊन गेल्यात. त्यात फक्त व्यथा व्यक्त केली गेली कीं आपल्याच समाजात भगवद्गीते विषयी फारशी आस्था दिसत नाही. ते असेलही तसे. पण तो विषय इथे नाही. इथे भगवद्गीतेची थोडी ओळख करून द्यावी असे वाटते. ते अधिक महत्वाचे आहे. कारण जी गोष्ट माहितीच नाही त्याबद्दल आस्था कशी निर्माण व्हावी? म्हणून हा एक छोटासा प्रयत्न.

मला स्वत:ला असा अनुभव आला आहे कीं शाळेत असताना भगवद्गीतेतला १२ वा अध्याय शिकवला जाई. पण त्यावेळी शिक्षकांनी अशी व्यथा बोलून दाखवल्याचे स्मरते कीं युद्धभूमीवर इतका वेळ कसा काय मिळाला समजत नाही. कारण सगळी गीता वाचायला अडीच तीन तास तरी सहज लागतात.

माझ्याही मनात ते विचार तसेच घर करून बसले गेले. तसे होते कारण आपले गुरुजीनी जे सांगितलं ते विद्यार्थी प्रमाण मानत असतात. ज्या काळात ही गोष्ट घडली तो काळ खूप पूर्वीचा आहे. कारण आज माझे वय आहे ७८ वर्षे. त्यानंतर माझ्या मुलानी १२वीत

असताना हाच प्रश्न उपस्थित केला. आज नक्की आठवत नाही पण सुमारे १९७९मध्ये त्याने विचारले. कारण त्यांनाही त्यांच्या शिक्षकांनी असेच सांगितले पण आता फरक असा होता कीं अडीच तीन तासा ऐवजी सात तास कसे काय मिळाले असतील असा झाला होता. म्हणजे दिवसेंदिवस गैरसमज वाढतच जाणार असे दिसते. पण त्याच्या प्रश्नामुळे मी अस्वस्थ झालो.

१९६७मध्ये महाराजांची (गुळवणी महाराजांची) दीक्षा परमभाग्याने मला मिळालेली होती. मला असे प्रश्न पडले कीं मी त्याना अंतरातून प्रश्न विचारीत असे. तसा तो विचारला व मग सद्गुरूंनी केलेल्या मार्गदर्शना प्रमाणे सगळा अभ्यास सुरु झाला. ते वर्ष होते १९८०. तेंव्हा पासून महाभारताच्या वाचनातून अनेक गोष्टी समजू लागल्या. मला स्वत:ला त्या वाचनातून जे समजले ते जसे समजले तसे इथे मांडणार आहे. सद्गुरूंनी मूळ महाभारताचा अभ्यास व गीतेचा अभ्यास करवून घेतला. भगवद्गीता लहानपणापासून वाचत असल्यामुळे व हा अभ्यास सुरु केल्यानंतर झालेल्या सरावामुळे सगळी गीता वाचायला फक्त १ तास लागू लागला. महाभारत वाचल्यावर पहिली गोष्ट लक्षात आली कीं भगवद्गीता ही ग्रंथ रूपाने युद्ध सुरु झाल्यावर ११व्या दिवशी(म्हणजे मार्गशीर्ष एकादशीला) प्रकाशित झाली.

तसे कां झाले याचे कारण असे कीं, जेंव्हा धृतराष्ट्राने युद्धाला परवानगी दिली तेंव्हा कार्तिक मासातल्या वद्य पक्षात कौरव

पांडव आमने सामने कुरुक्षेत्रावर जमा झाले. हे महायुध्द फार भयंकर होणार असल्याचे व्यासांना जाणवले. हे महायुध्द टाळण्याचा अखेरचा प्रयत्न करावा म्हणून महर्षी व्यास युद्धसुरु होण्यापूर्वी म्हणजे आदल्या दिवशी हस्तिनापूरला धृतराष्ट्राचे मन वळवण्यास आले. व्यासांचे यथोचित स्वागत झाले. आसनस्थ झाल्यावर व्यास धृतराष्ट्राला काय म्हणाले ते पुढच्या लेखात पाहू.

# श्रीमद्भगवद्गीते विषयी

# लेख २ रा

महर्षी व्यास युद्धसुरु होण्यापूर्वी म्हणजे आदल्या दिवशी हस्तिनापूरला धृतराष्ट्राचे मन वळवण्यास आले. हे आपण मागच्या म्हणजे पहिल्या लेखात वाचले. आता व्यासांचे यथोचित स्वागत झाले व आसनस्थ झाल्यावर,

व्यास धृतराष्ट्राला म्हणाले, “ धृतराष्ट्रा तूं अजूनही युध्द टाळू शकतोस. राजा म्हणून तुझी आज्ञा झाल्यावर दुर्योधनाने जरी तुझे ऐकले नाही तरी भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, कृतवर्मा, शल्य, इत्यादी तुझ्या सहाय्यास धावून येतील. कारण त्यांच्यापैकी कोणालाही हे युद्ध नको आहे. त्यांच्यावर ते लादले गेले आहे. मला तर भीषण संहार दिसत आहे. तूं तो टाळावास असे मला वाटते. शिवाय योगही चांगले दिसत नाहीत. वक्रीमंगळाने मघा नक्षत्र व्यापले आहे. तेरा तेरा दिवसांचे दोन पक्ष आले आहेत. येत्या अमावास्येला सूर्यग्रहण आहे. अरुंधती नक्षत्र वसिष्ठांना डावलून पुढे गेले आहे. हे सर्व कुयोग आहेत यावरून सृष्टीत भयानक संहार संभवतो. ते टाळणे हे मूर्धाभिषिक्त राजाचे कर्तव्य आहे, म्हणून तुझ्याकडून मी तशी अपेक्षा करीत आहे.”

हे सर्व अत्यंत थंडपणे ऐकत असलेला धृतराष्ट्र व्यासांना म्हणाला, "अशा कुयोगामुळे जर नरसंहार संभवत असेल तर तो मी दिलेल्या आज्ञेमुळे कसा टळणार? हे मला समजत नाही, शिवाय परिस्थिती आतां माझ्या हातात राहिलेली नाही. दुर्योधनाने सर्व परिस्थिती स्वत:च्या आधीन करून घेतली आहे. अशावेळी मी त्याला युद्ध थांबवण्याची विपरीत आज्ञा केली तर त्याचा तेजोभंग होऊन त्याचा मलाच त्रास होईल. शिवाय दुर्योधनावर माझे मनापसून प्रेम आहे. त्यामुळे मला तसे करवणार नाही."

इथे धृतराष्ट्राला थांबवीत व्यास म्हणाले,

"राजा! थांब! दुर्योधनावर प्रेम असल्याचा बहाणा करू नकोस. तसे असते तर मला काही वाईट वाटले नसते, कारण प्रजेवरील निरपेक्ष प्रेमामुळे केलेल्या गोष्टीसुद्धा भगवंताला आवडतात. दुर्दैवाने दुर्योधनावर तुझे जराही प्रेम नाही. केवळ आपल्या कुवासना भागवण्यासाठी तूं आजवर दुर्योधनाचा वापर करीत आला आहेस. तूं तुझी सर्व कपट कारस्थाने व विकृतभोग लालसा तृप्त करून घेण्यासाठी सोयीस्कर शरीर म्हणून त्याचा वापर करीत आला आहेस. राजन् ! मी जे कुयोगाचे वर्णन केले आहे त्याची विपरीत बाधा "काल, कर्म व स्वभाव" यांच्या माध्यमातून स्वार्थी, अधर्मी, कपटी इत्यादी दुर्वर्तनी जीवांना होते. असा शास्त्राचा अभिप्राय आहे. सदाचारी, ईश्वरभक्त, निरपेक्ष, निस्वार्थी व प्रजेवर खरे प्रेम करणाऱ्या जीवांना कुयोग बाधेची संभावना फार कमी असते व

झालीच तर ती विपरीत नसते. धृतराष्ट्रा! आपल्या पापकर्माच्या कारवाया अव्याहत चालू ठेवण्यासाठी तूं स्वत:च्या शरीर ऐवजी पापाने बरबटलेले दुर्योधनाचे शरीर अत्यंत क्रूरपणे वापरीत आहेस. असे असताना प्रेमाचा कसला बहाणा करतोस? अरे ह्या युद्धाची परिणीती अत्यंत वाईट होणार आहे. दुर्योधनाच्या वाट्याला शारीरिक व मानसिक क्लेशांसह राज्यत्याग व देहत्याग करावा लागेल. तर तुझ्या वाट्याला पुत्रवियोगाचे मानसिक क्लेश, राज्यात्यागाचे मानसिक क्लेश, ज्या भीमाची तुला अत्यंत भीती वाटते त्या भीमाकडून पदोपदी अपमान, अवहेलना इत्यादी क्लेश संभवतात. ह्या सर्व क्लेशांपासून मुक्त व्हावे असे जर तुला वाटत असेल तर तूं आजही नि:स्वार्थ बुद्धीने वासुदेवाचे स्मरण करून सद्बुद्धीची याचना कर. ह्या नश्वर राजवैभवाचा मनातून त्याग कर. अव्यभिचारी भक्तीने प्रजाकल्याणाचा हेतू मनात धारण करून युध्द बंदीची आज्ञा दे! राज्य पांडवांच्या हवाली कर. त्यांमुळे तूं सम्राट राहशील व सर्व प्रजेचे कल्याण होईल."

महर्षी व्यास हे सांगत असताना धृतराष्ट्राचे काही वेगळेच विचार चालू होते. त्याच्या मनात भीष्मांचे सरसेनापतीपद घर करून होते. भीष्म म्हणजे साक्षात् धर्म-मूर्ति. ते इच्छा मरणी व अजिंक्य. सरसेनापती म्हणून ते कौरवांचे रक्षण करणारच. कृपाचार्य, अश्वत्थामा हे दोघेही चिरंजीव आहेत. कर्णा जवळ इंद्राचे अमोघ वज्र आहे. जयद्रथाने शिवाकडून वर प्राप्त करून घेतला आहे. द्रोण धर्मनिष्ठ

आहेत. सर्वात महत्वाचे म्हणजे दुर्योधनाने ११अक्षौहिणी सैन्य मोठ्या कुशलतेने सिद्ध केले आहे, तर पांडवांचे फक्त ७ अक्षौहिणी सैन्य आहे, मग माझा पराभव कसा शक्य आहे? अधर्म तर पांडवांना करावा लागणार आहे. त्यांनाच आपल्या गुरूंना, पितामह भीष्मांना, कृपाचार्यांना, आपल्या मामाला, अशा सगळयाच वडीलधाऱ्यांना मारावे लागणार आहे. म्हणजे अधर्म सगळा त्यांच्याकडूनच होणार. पाप पाप म्हणतात ते आधी पांडवांच्या वाट्याला जाणार. मला काळजी करण्याचे काहीच कारण नाही. अशा विचारात धृतराष्ट्र गप्प बसून राहिला.

महर्षी व्यासांबरोबर चर्चा करायला मिळाली त्यातून धृतराष्ट्राने स्वार्थासाठी अधिक ज्ञान मिळवण्यासाठी एक मोघम प्रश्न विचारला, “ हे महर्षे! कुमुहूर्त तर उभय पक्षाला आहे. युद्ध तर अटळ आहे. युद्धाचा शेवट कुणाच्या तरी एकाच्याच विजयाने होणार. तो कोणाचा असेल?”

यावर महर्षी व्यास म्हणाले, “राजन्! तुझ्या ह्या प्रश्नाचे उत्तर असे आहे कीं ‘धर्म एव हतो हन्ति| धर्मो रक्षति रक्षित:||’ त्यामुळे तूं प्रत्यक्षच पहा हे कसे घडते ते. मी तुला युद्ध संपे पर्यंत दिव्यदृष्टी प्रदान करतो. त्या दिव्यदृष्टीने तूं कुरुक्षेत्रावरच काय पण विश्वातल्या कोणत्याही ठिकाणची घटना पाहू शकशील.”

इथे धृतराष्ट्र गोंधळाला. भगवान श्रीकृष्णांच्या विश्वरूपाचे दर्शन घेण्यासाठी धृतराष्ट्राने भगवान श्रीकृष्णांकडे दिव्यदृष्टीची

याचना करताना ‘ तुझे रूप पहिल्या नंतर आणखी काही पाहण्याची इच्छा नाही !” असे म्हटले होते. निदान आयुष्यात भगवंताशी एकदा तरी खरे बोलल्याचे पुण्य गाठी असावे म्हणून धृतराष्ट्राने धूर्तपणे ती दिव्यदृष्टी संजयाला देण्याची विनंती महर्षी व्यासांना केली. महर्षी वेदव्यासांच्या मनात निदान युद्धातला भयानक संव्हार कळून हा युद्धबंदीची आज्ञा देईल तरी पुढील अनर्थ टळेल. निदान भीष्म पतनानंतर जरी युद्ध थांबवण्याची इच्छा झाली तरी खूप होईल. म्हणून व्यासांनी संजयला दिव्य दृष्टी दिली व आपल्या आश्रमात परतले.

महर्षी वेदव्यासांनी संजयाला जी दिव्य दृष्टी दिली होती त्या दृष्टीचे सामर्थ्य अफाट होते. त्या दृष्टीमुळे मानवी मनात प्रकट होणाऱ्या भावांचेही ज्ञान होणार होते. मनोवेगाने दृष्य व घडून गेलेले अदृश्य प्रसंगही दिसणार होते. बसल्या जागेवरून संजय भूलोकातील घटना अवलोकू शकणार होता. हे धृतराष्ट्राला समजल्यावर धृतराष्ट्राने संजयाला दुसऱ्या दिवसापासून संपूर्ण भूलोकात समतल भूमी कुठे कुठे आहे, उपयुक्त खनिजे कोणत्या ठिकाणी आहेत. चांगली शेती कोणत्या ठिकाणी होऊ शकते इत्यादी माहिती विचारण्यास सुरुवात केली. धृतराष्ट्र मनाशी हे पक्के समजून होता कीं सरसेनापती भीष्म असल्यामुळे मला काहीच काळजी करण्याचे कारण नाही. मी जिंकणार व सम्राटपदी राहणार ह्या भ्रमात तो विविध माहिती संजयाच्या दिव्यदृष्टीतून काढून घेत होता. म्हणजे युद्ध संपल्यावर आपल्याला आपले वैभव वाढवता येईल. ह्या भ्रमात तो मार्गशीर्ष

दशमीपर्यंत संजयला युद्धा बद्दल काहीच विचारीत नव्हता. मार्गशीर्ष दशमीला रात्री बऱ्याच उशिरा एक सेवक भीष्म रणांगणात पडले अशी बातमी घेऊन हस्तिनापूरच्या राजवाड्यात धृतराष्ट्राकडे आला. त्यावेळी धृतराष्ट्राच्या पायाखालची वाळू सरकली. तो पांढराफटक पडला. आणि तसाच कोसळला. तो शुद्धीवर येईपर्यंत पहाट होत आली होती. शुद्धीवर आल्यावर त्याने संजयाला पाचारण केले. संजय उजाडता उजाडता आला. संजय येताच धृतराष्ट्राने अत्यंत उद्वेगाने नक्की काय व कसे घडले हे समजून घेण्यासाठी ‘‘धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः | मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ||’’ असा प्रश्न विचारला. आणि मग संजयाने पहिल्या दिवसापासूनचा वृत्तांत त्याला निवेदन केला. व्यासांनी तो ग्रथित केला. ती ही भगवद्गीता त्या दिवशी ग्रथित झाली म्हणून ‘गीता’ जयंती’ मार्गशीर्ष शुद्ध एकादशीला येते. आतां ती रणांगणावरच सांगितली गेली कीं कसें हे पुढें पाहू.



# श्रीमद्भगवद्गीते विषयी

# लेख ३ रा

गीता जयंती मार्गशीर्ष शुद्ध एकादशीला येत असल्यामुळे अनेकांचा समज असा आहे कीं युद्ध एकादशीला सुरु झाले. पण तसे नाही. हे दुसऱ्या लेखात सविस्तर लिहिले आहे. युद्ध मार्गशीर्ष प्रतिपदेला सुरु झालेले आहे. युद्धाची आचारसंहिता उभयपक्षांच्या सरसेनापतींच्या अनुमतीने ठरली गेली होती. कौरवांचे सरसेनापती पितामह भीष्म होते तर पांडवांचे सरसेनापती धृष्टद्युम्न होते. युद्धाची सुरुवात सूर्योदया नंतरच होणार होती. युद्ध उभयपक्ष्यांच्या सरसेनापतींच्या विशेष संकेता खेरीज सुरु होणार नव्हते. त्यात अनेक नियम ठरले गेले होते. त्यातले काही असे कीं अतिरथीने अतिरथी बरोबर, महारथीने महारथी बरोबर, रथीने रथी बरोबर, अर्धरथीने अर्धरथी बरोबर, पदातीने पदाती बरोबर युद्ध करावयाचे. रणभूमीच्या मर्यादा ठरवल्या गेल्या होत्या व जो रणभूमीच्या बाहेर जाईल त्याच्याशी युद्ध करावयाचे नाही, तसेंच जे युद्ध सामुग्री पुरवणारे वाहक वगैरे आहेत त्यांच्यावर प्रहार होता कामा नये इत्यादी अनेक नियम ठरवले गेले होते. आतां गीता ही रणभूमीवर सांगितली गेली

किंवा कसे हा प्रश्न आहे. तर महाभारत असे सांगते कीं गीता रणभूमीवरच सांगितली गली. कशी ते समजून घेण्या सारखे आहे. कुरुक्षेत्रावर पांडवसेना व कौरवसेना ब्राह्ममुहुर्तापासुनच व्यूहरचनेत दंग झाली होती. आता ब्राह्ममुहूर्त म्हणजे आजच्या काल मापनाच्या परिमाणात पहाटे साडेतीनच्या आसपास समजू. महाभारतात वर्णन आहे कीं उजेडासाठी मोठ मोठे पलिते तयार केले गेले होते. त्याप्रकाशात दोन्ही बाजूने तयारी होत होती.

भीष्मांना मध्यावर ठेवून कौरवसेना रणमैदानाकडे निघाली होती. त्यांत जल्लोष नव्हता पण समुद्राच्या लाटा जशा भरतीच्यावेळी फोंफावत पुढें येतात तसा तो सेनासागर पुढे पुढे सरकताना दिसत होता. वीस हजार रथी, दहाहजार हत्ती, साठलक्ष पायदळ, यांनी घेरलेले उंच धिप्पाड, गोरेपान, तेजस्वी भीष्म भास्करासारखे मध्यभागी तळपत होते. त्यांचे लखलखणारे पांढरेशुभ्र शिरोभूषण, चकाकणारे पांढरेशुभ्र कवच, झळझळीत पांढरेशुभ्र कटिवस्त्र, भरदार छातीवर रुळणारी पांढरीशुभ्र दाढी, टपोरे तेजस्वी तीक्ष्ण व अंत:करणाचा वेध घेणारे नेत्र, गंभीर व करारी चेहरा, आजानुबाहुंमध्ये धरण केलेले ते भव्य धनुष्य, असा विशाल मनाचा तो एक मेरुपर्वतच भासत होता.

त्याच्या समोरूनच ‘वज्रव्यूह’रचनेत युधिष्ठिर महाराजांचे आमन झाले. भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाच्या रथाचे सारथ्य

करीत होते. भगवान् श्रीकृष्ण व रथावर ध्वजधारक हनुमंत यांच्यामुळे रथ अत्यंत दिव्य दिसत होता. दोन्ही सेना एका विविक्षित अंतरावर येऊन आमने सामने स्थिर झाल्या. युधिष्ठिराने ती प्रचंड सेना पाहिली व त्या मानाने आपली सेना खूपच कमी असल्याचे जाणवून त्याच्या मनात नकळत विचारांचे काहूर माजले. त्याच्या चेहऱ्यावर काळजीची छटा उमटली. ती नेमकी अर्जुनाच्या नजरेने टिपली. अर्जुन सावधानतेने युधिष्ठिरा जवळ आला. सेनाबळ व अजेय पितामह समोर असताना आपण विजयाची आशा ठेवावी काय? असा प्रश्न त्याने अर्जुनाला विचारला! तत्क्षणी बुद्धिमान् व संयमी पार्थ म्हणाला, " युद्धात केवळ बल व पराक्रम यांनी विजय प्राप्त होत नाही महाराज. सत्यनिष्ठा, धर्मनिष्ठा, सज्जनता व उत्साह यांनी बळ व पराक्रम कार्यान्वित झालेल्यांनाच युद्धात विजय प्राप्त होतो. अधर्म, भोगेच्छा, लोभ, मोह, दर्प, अहंकार व हाव यांचा धर्माधिष्ठित निरपेक्ष त्याग जिथे असतो तिथेच विजयाला वास्तव्य करावे लागते. आपल्या सेनेत विजयधर्म भगवान् श्रीकृष्ण स्वत:च आहेत. त्यामुळे महाराज आपण निःशंक मनाने भगवान् श्रीकृष्णांच्या मार्गदर्शना प्रमाणें युद्ध करू. त्यात जे होईल ते आपल्या कल्याणाचे असेल. मग जय वा पराजय यांच्या विचाराला वाव कुठला?"

अर्जुनाच्या या उत्साहवर्धक बोलण्यामुळे युधिष्ठिर महाराजांचा चेहरा क्षात्रतेजाने एकदम चमकू लागला. सळसळत्या

रणोत्साहाने त्यांचे बाहू स्फुरण पावले. इतक्यात युधिष्ठिरांनी धनुष्याला मस्तक लावले व ते नीट रथात ठेवले. अंगावरचे कवचही उतरवले. रथातून खाली उतरले. युधिष्ठिरांच्या या कृतीमुळे अर्जुनच काय पण सर्वच गोंधळले. अर्जुनाने भगवान् श्रीकृष्णांकडे पाहिले. श्रीकृष्णांचा संकेत जाणून अर्जुन पदाती होऊन युधिष्ठिरांच्या मागोमाग चालू लागला. ते पाहून भीम, नकुल व सहदेव हे पण त्यांच्या मागे निघाले. युधिष्ठिर हात जोडून भीष्मांच्या रथाकडे चालू लागला. हे पाहून कौरवसेनाच काय पण त्यांचे सर्व सेनापातीसुद्धा गोंधळले. पांडव युद्धावाचूनच शरण येतात कीं काय असे त्यांना वाटले. महामना धर्मनिष्ठ युधिष्ठिरांची बुद्धी त्याना कशी समजणार? सर्व पांडव भीष्मांच्या रथाजवळ आले. भीष्म निश्चल उभे होते. दुर्योधन तांतडीने पदाती होऊन तिकडे धांवला. युधिष्ठिरांनी भीष्मांच्या चरणी वंदन केले. इतर पांडवांनी त्याचे अनुकरण केले.

भीष्म अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनी अंत:करणपूर्वक पांडवांना “विजयी व्हाल!” असा आशिर्वाद दिला.

युधिष्ठिरांनी तत्काळ “आपण युद्धभूमीवर असताना हे कसे शक्य होईल?” असा सूचक प्रश्न केला.

तेंव्हा भीष्म म्हणाले, “तूं म्हणतोस ते खरे आहे. पण माझा आशीर्वादही तितकाच खरा आहे. माझीही एक प्रतिज्ञा आहे ती पूर्ण

होई पर्यंत तुला दम धरावा लागेल. ती पूर्ण झाली कीं मी माझ्या युद्ध निवृत्तीचा मार्ग तुला सांगेन. त्यासाठी तुला पार्थासह माझ्याकडे यावे लागेल. पार्थ जे करू शकेल ते इतर कोणीही करू शकणार नाही. पार्थाला कितीही अप्रिय असले तरी मी सांगेन ते करावेच लागेल. आज तुम्ही सर्वजण माझा आशिर्वाद मागण्यास आला आहात त्यामुळे मी प्रसन्न आहे. अन्यथा तुमची धडगत नव्हती. आतां आनंदाने परत जा. तुम्हा सर्व पांडवांना मी पुन्हा विजयाचा आशीर्वाद देतो.” असे बोलून भीष्मांनी त्याना परत पाठवले.

युधिष्ठिर आपल्या भावंडांसह गुरु द्रोणाचार्यांजवळ आला. त्यांना वंदन केले. युद्धाची परवानगी मागितली. गगनापेक्षाही गहन हृदयाच्या द्रोणाचार्यांनी त्यांना विजयाच्या आशिर्वादासह युद्धाची परवानगी दिली.

तेंव्हां युधिष्ठिरांनी त्यानाही ते कसे शक्य होईल? असा प्रश्न विचारताच दिलखुलास हसत तें म्हणाले, “तुझी शंका रास्त आहे पण दुर्योधनाच्या अर्थदास्यत्वामुळे मी केवळ अधर्माच्या बाजूने युद्ध करीत असल्यामुळे व धर्मरूपी श्रीकृष्ण तुमच्या बाजूला असल्यामुळे विजय तुमचाच होईल. तूं जराही शंका बाळगू नकोस!” असे म्हणून आपल्या मृत्यूचा मार्ग म्हणजे धृष्टद्युम्न असल्याचे सांगून परत एकदा काय वाट्टेल ते झाले तरी विजय तुम्हालाच प्राप्त होईल असा आशिर्वाद देऊन पांडवांना परत पाठवले.

आपल्या रथाकडे परत जाताना अर्जुनाच्या मनात जी घालमेल सुरु झाली ती पितामह भीष्म व गुरु द्रोणाचार्य यांनी त्यांना दिलेल्या विजयाच्या आशीर्वादामुळे. त्याचा परिणाम अर्जुनाच्या मनावर काय व केंव्हां झाला ते पुढे पाहू. अर्थात तो परिणाम धृतराष्ट्राच्या मंत्र युद्धाचा परिणाम होता.



# श्रीमद्भगवद्गीते विषयी

## लेख ४ था

### लेखक:- अविनाश म.नगरकर

आपल्या रथाकडे परत जाताना अर्जुनाच्या मनात जी घालमेल सुरु झाली ती पितामह भीष्म व गुरु द्रोणाचार्य यांनी त्यांना दिलेल्या विजयाच्या आशीर्वादामुळे. त्याचा परिणाम अर्जुनाच्या मनावर काय झाला व केंव्हां झाला हे आपण समजून घेणार आहोत. आजचे हे वर्णन म्हणजे गीतेतल्या पहिल्या अध्यायात संजयाने दुसऱ्या श्लोकापासून सुरु केलेले ते साडेविसाव्या श्लोकापर्यंत आहे.पण ते प्रत्यक्ष घडत होते म्हणून अर्जुन व श्रीकृष्ण यांच्या संवादात येत नाही.

पांडव आपल्या वज्रव्यूह रचनेत परतले. भगवान् श्रीकृष्णांना वंदन करून आपआपल्या रथात आरूढ होऊन युद्ध सज्ज झाले. उभय सेनेत स्थिरस्थावर

झाल्यावर पितामह भीष्म आपल्या रथांत उभे राहिले. प्रतिपक्षाच्या सेनासागराकडे आपली तीक्ष्ण व धारदार नजर टाकली आणि आपल्या आजानुबाहूत सिंहनाद नामक शंख धारण करून दीर्घश्वास घेऊन मुखाजवळ नेऊन फुंकला. त्याच्या निनादाने रथच काय पण रणभूमीही थरथरली. त्या पाठोपाठ इतरांच्या शंखांचे व इतर वाद्यांचे विविध ध्वनी उमटून रणोत्साहाला उधाण आले.

प्रतिपक्षाचा शंखनाद पूर्ण विरण्याच्या आतच अर्जुनाचे सारथ्य करणारे भगवान् श्रीकृष्ण उभे राहिले. त्यांनी आपल्या विशालबाहूंच्या लांबसडक बोटे असलेल्या पंजात हंसासारखा गुबगुबीत पांचजन्य नामक शंख घेतला. आपल्या गुलाबी अधरांजवळ आणला. त्यावेळी पूर्वेकडे मुख असलेल्या भगवान् श्रीकृष्णांचे मुख अत्यंत तेजस्वी दिसत होते. तशा स्थितीत अत्यंत विलोभनीय दिसणाऱ्या भगवंतांनी शंख फुंकण्यासाठी शंखाचे टोक क्षितिजाच्या वर उचलले व

आवेषाने शंख फुंकला. त्याच्या तीव्र निनादाने संपूर्ण धरणीच काय पण आकाशही हादरते आहे कीं काय असे वाटू लागले. अनेक पदाती त्या ध्वनीच्या तीव्रतेमुळे मूर्च्छना येऊन खाली पडले.

भगवान् श्रीकृष्ण आपल्या शंखाचा निनाद वाढवीत असतानाच पार्थाने आपला देवदत्त नामक शंखाचा ध्वनी निनादवला. त्या दोघांच्या ध्वनी निनादामुळे ब्रह्मकटाहाचे आतां तुकडे होणार कीं काय असेच वाटू लागले. प्रचंड हलकल्लोळ माजला. सैनिक, अश्व, गज, सगळे जागीच स्तब्ध झाले. त्या गोंधळात भीमाने आपल्या पौंड्रक नामक शंखाच्या निनादाची भर टाकून जणू आता प्रलयच होणार असल्याचा संकेत दिला. पाठोपाठ धर्मराजाने ‘अनंतविजय’, नकुलाने ‘सुघोष’ व सहदेवाने ‘पुष्पक’ असे आपापल्या शंखांचे निनाद त्यांत मिसळून सर्व निनादाची तीव्रता इतकी वाढवली कीं ती ब्रह्मकटाह भेदून गेली. भगवत्स्मरणात असलेला शेषही दचकला.

धृतराष्ट्रपुत्रांच्या अंत:करणाचा थरकांप उडाला. पांडवांच्या शंखांचे नाद विरतात न विरतात तोंच युधिष्ठिरांचा रथ भरघाव निघाला व दोन्ही सैन्यांच्या मधोमध येऊन स्थिरावला. युधिष्ठिरांनी आपल्या घनगंभीर आवाजात घोषणा केली, "ज्यांना अजूनही पक्ष बदलायचा असेल त्यांना पूर्ण मुभा आहे. कौरव पक्ष अन्याय्य लढ्यासाठी उभा आहे तर आमचा पक्ष न्याय्य लढ्यासाठी उभा आहे. ज्यांना हे योग्य वाटते त्यांनी आमच्या पक्षात यावे व अयोग्य वाटते त्यांनी कौरव पक्षास जाऊन मिळावे!"

युधिष्ठीरांची ही आगळी वेगळी घोषणा करतांच काही क्षण निरव शांततेत गेले. इतक्यात दुर्योधनाला धक्का बसला! कारण त्याचा सावत्र भाऊ, धृतराष्ट्राचा दासीपुत्र 'युयुत्सु' रणशिंग फुंकीत दिमाखाने छाती पुढे काढून व ताठ मानेने पांडवांच्या पक्षात आला. त्याला इतर सर्व पुरुषार्थांपेक्षा धर्म हा पुरुषार्थ अधिक महत्वाचा वाटला. युयुत्सुच्या संरक्षणाची जबाबदारी

सर्वच्या सर्व धार्तराष्ट्रांना मारणाऱ्या भीमावर पडली. युयुत्सुच्या या कृतीने पांडवसेनेचा आत्मविश्वास वाढला तर कौरवसेनेत नाही म्हटले तरी स्वकृतीचा न्यूनगंड निर्माण झालाच. युयुत्सु पांडवसेनेत स्थीरस्थावर होत होता तोंवर एकवार सर्व प्रतिस्पर्धी योद्ध्यांवर नजर टाकावी ह्या हेतूनें अर्जुनाने भगवान् श्रीकृष्णांना आपला रथ उभय सेनेच्या मध्यें घेण्याची विनंती केली. अजून सूर्योदय झालेला नव्हता. सूर्योदयाला अवकाश होता. अर्जुन जेंव्हा सगळी प्रतिस्पर्धी सेना न्याहाळू लागला तेंव्हा त्याची अवस्था कशी बदलत गेली हे आपण पुढील लेखात पाहू.



# श्रीमद्भगवद्गीते विषयी

# लेख ५ वा

युयुत्सु पांडवसेनेत स्थीरस्थावर होत होता तोंवर एकवार सर्व प्रतिस्पर्धी योद्ध्यांवर नजर टाकावी ह्या हेतूनें अर्जुनाने भगवान् श्रीकृष्णांना आपला रथ उभय सेनेच्या मध्यें घेण्याची विनंती केली. भगवान श्रीकृष्णांनी रथ उभय सेनासागराच्या मध्यावर आणतांच अर्जुनाने प्रथम कोणाकोणाला टिपायचे हे न्याहाळायला सुरुवात केली. दुर्योधन, दुःशासन इत्यादी पाहता पाहाता कृतवर्म्यावर नजर गेली. मग शल्यमामा, गुरुकृपाचार्य, गुरुद्रोणाचार्य, त्यांचा पुत्र अश्वत्थामा आणि मग पितामह भीष्मांवर अर्जुनाची नजर स्थिरावली. आपल्या प्रातःस्मरणीय आजोबांना पाहून अर्जुनाच्या मनांत कालवाकालव सुरु झाली. भीष्मांचा पोलादा सारखा धिप्पाड पांढऱ्याशुभ्र वस्त्रांतला देह ज्या रुबाबात धनुष्य सरसावून उभा असलेला पार्थाने पाहिला, तेंव्हा त्याच्या मनात प्रथम भीष्मांचा “विजयी व्हाल!” हा आशिर्वाद आठवला. अर्जुनाला मी सांगेन तसे आचरण करण्यास सांग वगैरे सगळा संवाद आठवला. याचा अर्थ भीष्म स्वखुषीने मरण पत्करणार होते! तसेंच आपले गुरु द्रोणाचार्यही जाणून बुजून मृत्यू स्वीकारणार होते. स्वखुषीने आत्मदान करायला

निघालेल्या ह्या महामनस्क वडीलधाऱ्या मंडळींनी अर्जुनाच्या मनात चांगलीच कालवाकालव निर्माण केली. त्याचे सर्वांग शहारले. हातातल्या गाण्डीवधनुष्या वरची पकड सैल झाली. स्वत:ला कसेबसे सांवरित भगवान श्रीकृष्णांना तो म्हणाला, 'हे केशवा! महामना पितामह, आचार्य द्रोण, मामा, श्वशुर, नातू हे सर्व आमच्याच कुळातले. आम्हाला विजयाचा आशिर्वाद देऊन स्वत: मरण पत्करण्यास सिद्ध झालेल्या पितामहांच्या अथांग मनाचा थांगच लागत नाही. अशा महान् पितामहांना व गुरुंना मारून आम्ही राज्यसुख भोगावे हे माझ्या मनात येइनासे झाले आहे. दुसरे असे कीं हे एकटे मारून थांबताच येणार नाही. हा सगळा गोतावळा निपटावा लागेल. त्यांत हे सगळे तरणेबांड नातू मारायचे, मग त्यांच्या कुलस्त्रियांचे वाकडे पाऊल पडायचे, म्हणजे आधी त्यांना मारल्याच दोष माथी घ्यायचा आणि नंतर यांच्या स्त्रियांच्या व्यभिचाराचा दोष कुळाला जडवून घ्यायचा! श्राद्ध घालायला कोणी उरणार नाही अशी स्थिती होणार. म्हणजे कुळात अधर्म वाढणार. त्यांत काय लाभ आहे? पितामह भीष्मांसारख्या, द्रोणाचार्य, कृपाचार्य इत्यादीं सारख्या धर्मनिष्ठांना मारून राज्यसुख उपभोगण्याचे मनाला इतके तापदायक वाटू लागले आहे कीं त्यापेक्षा धृतराष्ट्राने निरोप पाठवून कळवले होते तसे भिक्षा मागणे काय वाईट?" असे म्हणून दिग्मूढ झालेला अर्जुन गाण्डीव धनुष्य रथातच ठेऊन उद्विग्न होऊन बसला.

भगवान् श्रीकृष्ण क्षणभर आवाक् झाले! त्यांना अर्जुनाची कींव आली. आपल्या कणखर वाणीने ते अर्जुनाला म्हणाले, “नको त्या ठिकाणी अवसानघात करून बसणे तुझ्या सारख्या विजयी विराला शोभत नाही. मोठ्या ज्ञानाच्या गोष्टी बोलून अस्थानी स्वत:चे दौर्बल्य प्रकट करू नकोस.” त्यावर अर्जुन म्हणाला, “नाही भगवंता हे मानसिक दौर्बल्य नाही. हा धर्मविचार आहे. एकतर विशाल हृदयाच्या पितामहांच्या रक्ताने हात बरबटवून घ्यायचे. मग प्रचंड संहार करून आपल्याच लोकांच्या रक्ताने हात बरबटवून घ्यायचे. गुरूच्या रक्ताने हात बरबटवून घ्यायचे. त्यापेक्षा भिक्षा मागून उदरनिर्वाह केलेला काय वाईट?” त्याचवेळी भगवान् श्रीकृष्णांच्या चेहऱ्यावर उमटलेला उपहासगर्भ हास्याचा भाव पाहून अर्जुन वरमून म्हणाला, “ हे भगवंता, माझी मन:स्थिती द्विधा झालेली आहे. माझ्या मनात निर्माण झालेला धर्मसंभ्रम कृपया दूर कर. मी तुला शरण आलो आहे. मला तूं गुरुस्थानी आहेस. तूं केलेल्या उपदेशाने माझी द्विधा मन:स्थिती निश्चितच नाहीशी होईल.”

असे अर्जुनाने म्हटल्यावर भगवंतांनी केलेला उपदेश व अर्जुनाचे प्रश्न आपण पुढील लेखात पाहू.

# श्रीमद्भगवद्गीते विषयी

# लेख ६ वा

भगवान् श्रीकृष्णांच्या चेहऱ्यावर उमटलेला उपहासगर्भ हास्याचा भाव पाहून अर्जुन वरमून म्हणाला, “ हे भगवंता, माझी मन:स्थिती द्विधा झालेली आहे. माझ्या मनात निर्माण झालेला धर्मसंभ्रम कृपया दूर कर. मी तुला शरण आलो आहे. मला तूं गुरुस्थानी आहेस. तूं केलेल्या उपदेशाने माझी द्विधा मन:स्थिती निश्चितच नाहीशी होईल.”

असे अर्जुनाने म्हटल्यावर भगवान् श्रीकृष्णांनी हे जाणले कीं उपप्लव्यात संजय शिष्टाईच्या माध्यमातून धृतराष्ट्राने केलेल्या मंत्रयुद्धाचा हा परिणाम आहे. याचे निराकरण केल्या खेरीज गत्यंतर नाही. हे जाणून भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, “हे नरोत्तम पार्था, विवेकी पुरुष अशाप्रकारचा विचार अस्थानी करीत नाहीत. कारण त्यांनी हे नक्की केलेले असते कीं स्वधर्माचरण हे निरपेक्षतेने व कर्तव्यबुद्धीने ईश्वरासाठी करावयाचे असते. व्यक्तिगत सौख्यासाठी नाही. तुला तुझ्या क्षात्रधर्माप्रमाणे युद्ध करणे अटळ आहे. आतां तूं कोणत्याही कारणाने परत फिरलास तर तूं भ्यालास हाच त्याचा अर्थ होईल. तुझी विजय नामाभिधान प्राप्त झालेली कीर्ती लयास जाईल. हे तर होईलच पण तूं असेच गृहीत धरून चालला आहेस कीं तूं त्यांना मारणारा व ते मरणार आहेत. तुम्हा पांडवांना विजय मिळावा म्हणून भीष्म, द्रोण,

कृपाचार्य इत्यादी महायोद्धे इथे आले आहेत असे तुला वाटते कां? शेवटी हे युद्ध आहे. काहीही घडू शकते. समज तूं हे युद्ध केलेच नाहीस तर हे काय अमर होणार आहेत कां? युद्ध म्हणजे एक घोर कर्म आहे हे मलाही मान्य आहे. पण हे क्षत्रियोचित् धर्मयुद्ध आहे. म्हणजे युद्धाचा कर्ता तूं नसून धर्म आहे. तूं केवळ निमित्तमात्र आहेस. ह्या युद्धाच्या निमित्ताने दोघांनाही फायदाच आहे. मृत्यूनंतर स्वर्गभोग व विजयानंतर राज्यभोग! पण पळून जाण्याने तुला यातले काय प्राप्त होणार आहे? तुझी अपकीर्ती तर होईलच पण पदोपदी अपमान होईल. अधर्म घडणार तो वेगळाच. भिक्षा मागायला गेल्यावर अपमानास्पद भीक मात्र मिळेल. कारण भिक्षा मागणे हा काही क्षात्रधर्म नाही. स्वधर्माचे थोडेसे पालनही महाभयापासून मुक्त करते. हे युद्ध काही अचानक उद्भवलेले नाही. धूर्त धृतराष्ट्राच्या कपट बुद्धीमुळे हे उद्भवले आहे. धर्म व अधर्म यांचा सत्याच्या निश्चयात्मक बुद्धीने साधक बाधक विचार करूनच आपण सर्वांनी हा युद्धाचा निर्णय घेतला आहे. त्यावेळी आप्त स्वकीय, भीष्म, द्रोण इत्यादी सर्व लक्षात घेऊनच योजना आखण्यात आल्या आहेत. तो निश्चय म्हणजे सत्य व सत्य म्हणजे 'ईश्वर'! मग आता प्रत्यक्ष भीष्म समोर आल्यावर तुझ्या मनांत जे भाव उमटले आहेत ते क्षणभंगुर आहेत. सत्य हे शाश्वत तर असत्य हे अशाश्वत. बुद्धी स्थिर कर म्हणजे ह्या संभ्रमातून बाहेर येशील. जडाच्या दर्शनाने भांबावून जायचे काय कारण आहे? वेदांचे अध्ययन करून तूं काय फक्त मंत्रच आत्मसात् केलेस? मग

त्यातल्या उपनिषदांनी सांगितलेल्या आत्मज्ञानाचे काय? अरे बाबा वेद हे त्रिगुणात्मक आहेत. त्यातील सत्य फक्त उपनिषदे प्रतिपादन करतात. बाकी वेद सगळे रज-तमात्मक सुख-दुःखादीचे वर्णन करतात. सुखासाठी स्वर्गादिफळांचे कर्म प्रतिपादन करतात. म्हणून तूं त्या मोहात टाकणाऱ्या विषयांच्या आधीन होऊ नकोस. जो विषयांच्या आधीन न होता कर्म करतो त्याला स्वर्गादी भोगांची आसक्ती निर्माण होत नाही. तो नित्यमुक्त असतो. फलापेक्षा न ठेवता कर्तव्य पालनासाठी जर तूं युद्ध करशील तर कोणत्याच पापाची तुला बाधा होणार नाही. तुझ्या मनांत जे द्वंद्व निर्माण झाले आहे ते केवळ वेदांत वर्णन केलेल्या त्रिगुणात्मक विषयांमुळे झालेले आहे. तूं जर वेदांत सांगितलेला आत्मानात्म विवेक स्वीकारून त्या आत्मानात्मविवेकाचा ध्यास धरशील व विषयरूप द्वंद्वाचा त्याग करशील तर तुझी बुद्धी लगेच स्थिर होईल. अरे तहानलेला जीव जलाशया जवळ जाऊन जसे तहान भागण्या पुरते पाणी पितो सगळा जलाशय काही पीत नाही तद्वत् वेदातून फक्त शाश्वत तत्त्व स्वीकारावे. कर्मफलाची आसक्ती न धरता कर्म करण्याचा कर्मयोग वेदांनी प्रतिपादन केलेला आहे. वेदातल्या पुष्पासम मधुर प्रलोभन दाखवलेल्या वचनांनी बुद्धीला मोह उत्पन्न होतो हे खरे पण त्या मोहात न अडकता तूं जर मन व बुद्धी यांचे ऐक्य साधशील तर तुझ्या चित्ताला समत्व प्राप्त होईल. हेच तर योगाचे सार आहे. त्या समत्वाने तूं स्थितप्रज्ञ होशील.”

अर्जुनाने स्थितप्रज्ञ म्हणजे काय हे विचारले. भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, “स्थितप्रज्ञ म्हणजे स्वार्थबुद्धीचा त्याग करून तत्त्वाधिष्ठित विवेकाने प्राप्त झालेले उचित कर्म करणे. आत्ता तुझ्या मनात पितामह भीष्म, गुरु द्रोणाचार्य इत्यादींचा तुझ्या हातून होणारा मृत्यू कल्पून जे मोह, माया, ममता इत्यादी भाव निर्माण झाले आहेत ते तूं स्वत:ला श्रेष्ठ धनुर्धर व जेता समजून झालेले आहेत. जेंव्हा स्थितप्रज्ञता नसते तेंव्हाच अहंकारादी विकार स्वार्थबुद्धीने उत्पन्न होतात. स्वार्थामुळेच विषयसुख घ्यावेसे वाटते. त्यालाच काम उत्पन्न होणे असे म्हणतात. कामामुळे बुद्धि विचलित होते. मग त्या कामाच्या सिद्धिच्या आड येणाऱ्या कोणत्याही कारणाने क्रोध उत्पन्न होतो. मग मोहग्रस्तता येते. म्हणजेच ईश्वराचा विसर पडतो. ईश्वराचा विसर म्हणजे स्मृतिभ्रंश. स्मृतिभ्रंशाने बुद्धिनाश. बुद्धिनाशाची परिणीती प्राण नाशात होते. परब्रह्मा खेरीज काहीच सत्य नाही. त्याच्या ठिकाणी स्थिर केलेल्या बुद्धिला स्थितप्रज्ञ असे म्हणतात. त्यालाच ज्ञान म्हणतात. ज्ञानी व अज्ञानी यातला फरक हाच कीं ज्ञानी पुरुष परमेश्वराला कधीच विसरत नाही तर अज्ञानी मनुष्य मिथ्या जग कधीच विसरत नाही. त्यामुळे ज्ञान हे ससर्वश्रेष्ठ व पवित्र आहे. ज्ञानी पुरुष कशानेच मोहग्रस्त होत नाही. तो परब्रह्माशी तादात्म्य पावतो.” इतके सांगून भगवान् श्रीकृष्ण थोडे थांबले.

# श्रीमद्भगवद्गीते विषयी

# लेख ७ वा

परब्रह्मा खेरीज काहीच सत्य नाही. त्याच्या ठिकाणी स्थिर केलेल्या बुद्धिला स्थितप्रज्ञ असे म्हणतात. त्यालाच ज्ञान म्हणतात. ज्ञानी व अज्ञानी यातला फरक हाच कीं ज्ञानी पुरुष परमेश्वराला कधीच विसरत नाही तर अज्ञानी मनुष्य मिथ्या जग कधीच विसरत नाही. त्यामुळे ज्ञान हे ससर्वश्रेष्ठ व पवित्र आहे. ज्ञानी पुरुष कशानेच मोहग्रस्त होत नाही. तो परब्रह्माशी तादात्म्य पावतो." इतके सांगून भगवान् श्रीकृष्ण थोडे थांबले. हे आपण सहाव्या लेखात पाहिले. आतां पुढे काय झाले ते पाहू.

हे ऐकून अर्जुन म्हणाला, "हे भगवंता परब्रह्माशी तादात्म्यता साधणे हाच जर जीवाचा प्रधान हेतू असेल तर त्या निश्चयाला मी तयार आहे. त्यासाठी मला या युद्धाच्या भरीस का पाडत आहात? आतां माझा अधिकच गोंधळ झाला आहे.कारण कृष्णा तूं कर्म प्रवृत्ती सांगतोस कीं कर्म निवृत्ती सांगतोस हेच मला समजेनासे झाले आहे. तेंव्हा एक काय ते निश्चित सांग कीं जेणे करून माझ्या मनाचा गोंधळ नाहीसा होईल!"

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, "अर्जुना! विहितकर्मप्रवृत्तीच्या आधारे कर्म करून कर्म निवृत्ती साधायला मी सांगत आहे. विहित धर्माचरणाच्या आधारे कर्तव्य म्हणून केलेल्या कर्माचे फल ईश्वराला

अर्पण करणे म्हणजे निष्काम कर्म. हीच कर्मनिवृत्ती. सर्व विहित कर्मे ईश्वराला अर्पण करून शोक, मोह रहित राहून धर्मयुद्ध करणे म्हणजेच नैष्कर्म्य! स्वधर्माचरण हे इह व परलोकीच्या सर्व भयांपासून मुक्त करणारे आहे. हाच योग मी पूर्वी विवस्वान मनुला सांगितला होता. विवस्वानाने इक्ष्वाकुला सांगितला होता. मग परंपरेने तो कांही काळ चालला पण पुढे परंपरा खंडित झाल्याने तो लुप्त झाला. तूं माझा परमसखा म्हणून मी तुला हा आज परत सांगितला आहे."

अर्जुन म्हणाला, "हे कसे शक्य आहे? विवस्वानाचा काळ उलटून अनेक वर्षे होऊन गेलीत. तुझा जन्म तर अलीकडचा. त्यमुळे हे सगळे विसंगत वाटते. त्याचा खुलासा करून मला निःसंशय कर!" भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, "अर्जुना! तुझे व माझे यापूर्वी अनेक जन्म होऊन गेले आहेत. तूं प्रकृतिच्या आधीन झाल्यामुळे तुझ्या ठिकाणी विस्मृती, शोक, मोह इत्यादी जीवदशेने प्राप्त होणारे धर्म निर्माण झाले आहेत. तसे ते माझ्या ठिकाणी नाहीत. मी अजन्मा, अविनाशी व प्रकृतीचा नियंता आहे. मी जन्माला आलो असे अविद्येने ग्रासलेल्या जीवांना वाटते. मी चराचरातल्या सर्व जीवांना यथार्थ जाणतो. त्यांचे नियंत्रणही मीच करतो. मी तुझे व माझे पूर्वीचे सर्व जन्म जाणतो तसे तूं जाणत नाहीस. मी अनादी, अनंत, निर्गुण, सर्वसाक्षी, सर्वगामी, सर्वांतर्यामी असल्याचे जाणून जे मत्पर होतात त्यांना जीवदशेचे पाप वा पुण्याचे स्वाभाविक गुणधर्म लागत नाहीत. सामुहिक सहजीवन सुरळीत व सुखावह व्हावे या उद्देशाने मी गुणकर्माधिष्ठित चातुर्वर्ण्य

निर्माण केला आहे. ते जरी गुणकर्माधिष्ठित असले तरी जो निरपेक्षतेने माझ्या स्मरणात राहून माझ्या मननात माझ्यासाठी स्वधर्माचरण करतो त्याला माझी प्राप्ती होते. असा मनुष्य जरी इतर संसारी मनुष्यासारखा कर्माचरण करताना दिसत असला तरी त्याने मनातून संसाराची आसक्ती सोडलेली असते. प्रारब्ध प्रमाण मानून विधिवशात् जे मिळेल त्यात तो संतुष्ट असतो. त्याने अद्वैत भावाने द्वेष व मत्सर रहित होऊन सर्व कर्मे मला अर्पण करण्याची हतोटी साध्य केलेली असते. म्हणून त्याला कर्मे करूनही नैष्कर्म्य साधलेले असते. तो मत्परतेने गुरुंना शरण जाऊन गुरुमुखातून मिळणाऱ्या परोक्षज्ञानाने विचारप्रवण होऊन आत्मसुखाचा प्रत्यय घेतो. ते आत्मज्ञान. त्या ज्ञाना इतके पवित्र काहीच नाही. म्हणून तूं स्वत: ज्ञानरूपी खड्गाने संशयाचा नाश कर. संकल्प विकल्प रहित सन्यस्त हो! निष्काम कर्मयोग आचरून युद्ध कर!" अर्जुन म्हणाला, 'एकदा सन्यस्त हो म्हणतोस व लगेच कर्मयोगी हो म्हणतोस तर नक्की काय करू?'

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, "अर्जुना! याचा अर्थ असा कीं मनात जय-पराजय, मी मारणारा व हे मरणारे किंवा हे मारणारे व मी मरणारा, असे जे संकल्प अथवा विकल्प निर्माण होतात त्यांच्याकडे पूर्ण दुर्लक्ष कर. कर्तव्यबुद्धी जागृत कर. ईश्वरीय कार्य करण्यास तत्पर हो. ही चित्ताची समस्थिती म्हणजे साक्षीरुप ज्ञानस्थिती. थोडक्यात म्हणजे अहंकार रहित होऊन विहित व नियत कर्म करणे म्हणजेच नैष्कर्म्य. कर्म व कर्तृत्व मला अर्पण करून युद्ध

कर कीं तोच संन्यास. संन्यास म्हणजे मी कर्ता या जाणीवेचा त्याग करून ईश्वरकर्ता व मी निमित्तमात्र ह्या जाणीवेतून सदाचाराने फळाची अपेक्षा न ठेवता केलेले कर्म. तोच कर्मसंन्यास! बाह्यदेहाची रहाटणी अपरिहार्य असल्यामुळे ती स्वधर्मानुसार सदाचाराने व निष्काम बुद्धीने करावी. तोच कर्मयोग व कर्मसंन्यास. त्यानेच माझी म्हणजे परब्रह्माची प्राप्ती होते. त्या साठीच सद्गुरुकृपा लागते.

आतां योगाभ्यासाविषयी थोडे समजून घे. योग म्हणजे सच्चिदानंद रूपाशी ऐक्य साधणे. आपण स्वत:च स्वत:शी शत्रुत्व कसे करतो ते ऐक. अहंकारानें स्वत:ला ह्या सच्चिदानंदरुपाहून भिन्न समजणे हे शत्रुत्व आहे. अनंत जन्मांच्या देहधारणेमुळे देह म्हणजे ‘मी’ ही विपरीत कल्पना आपल्या मनांत खोल रुजलेली असते. त्यामुळे तो देहाहंकार या सच्चिदानंदरुपाहून स्वत:ला भिन्न समजण्यामुळे फोफावत जातो. हा देहाहंकार घालवण्यासाठी गुरुभक्ती व ईश्वरभक्ती आवश्यक असते. इथूनच योगाभ्यास सुरु होतो. गुरुवाचनावर निष्ठा व श्रद्धा ठेवल्यास योगसाधनेत कष्ट होत नाहीत. मनाला प्रसन्न वाटेल अशा पवित्रस्थानी दर्भासनावर मृगाजिन व मृगाजिनावर धूतवस्त्र घालून समतल आसन घालावे. त्यावर आसनस्थ होऊन त्याग करण्यास अत्यंत कठीण अशा अहंकाराचा त्याग करून त्याग जमणे कठीण असते म्हणून दुर्लक्ष करून सद्गुरूस्मरण करावे. मनात येणाऱ्या सर्व विचारांकडे दुर्लक्ष करावे. हळूहळू चित्त एकाग्र करावे. मग ध्यानाचा अभ्यास करावा. ध्यान जमू

लागले कीं तन-मन दोन्ही विसरून सद्गुरू स्मरण होईल अशा अभ्यासाप्रत यावे. मग श्रीगुरूकृपेने जे घडेल त्याचा अनुभव घ्यावा. त्यात श्वासावर विजय प्राप्त होईल. साधना करता करता अचानक शरीरांतर्गत हालचालींना जोर येईल. पण न घाबरता साधना चालू ठेवावी. हळूहळू असा योगी मन व बुद्धी यांचे ऐक्य साधून माझी निर्गुण निर्विकार निराकार निश्चल निर्दोष नित्य व सच्चिदानंद स्वरुपाची अनुभूती घेतो. ही निःशब्द अवस्था असते. ह्या स्थिती पर्यंत येण्यासाठी आहार विहारादी नियम काटेकोर पाळावे लागतात. नियमांचे पालन करताना 'मी नियमांचे पालन करतो' अशी अहंकारी धारणा ठेवल्यास योगसिद्धी प्राप्त होत नाही. सद्गुरु माझ्याकडून हे सर्व करवून घेत आहेत अशी अव्यभिचारी धारणा झाली पाहिजे. तरच उपयोग होतो." इतके सांगून भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाच्या चेहऱ्यावरचे भाव न्याहाळू लागले.

# श्रीमद्भगवद्गीते विषयी

# लेख ८ वा

सद्गुरु माझ्याकडून हे सर्व करवून घेत आहेत अशी अव्यभिचारी धारणा झाली पाहिजे. तरच उपयोग होतो.” इतके सांगून भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाच्या चेहऱ्यावरचे भाव न्याहाळू लागले.

हे ऐकून अर्जुन म्हणाला, “हे भगवंता! मनाच्या चंचलत्वामुळे मला हे जरा कठीणच दिसते. मला माझी योग्यता तेवढी दिसत नाही.” तेंव्हा भगवंत म्हणाले, “अरे योग्यतेची काय खाण असते कीं काय? आपणच निश्चय करून मनाला ह्या अभ्यासाची गोडी लावली कीं मन तिथे रमू लागते. ह्या मनाचे तेच तर वैशिष्ट्य आहे कीं ते एकदा अनुभवलेले सुख पुन्हा पुन्हा अनुभवण्याची इच्छा निर्माण करते म्हणून त्या मनाला ह्या ब्रह्म रसाची गोडी एकदा निर्माण केलीस कीं तुझे काम झाले. म्हणून तूं त्याला माझ्या भक्तीची गोडी चाखव. निर्गुण निर्विकार परब्रह्माच्या ठिकाणी मन एकाग्र करणे सुरुवातीला अहंकारी विचारांनी व मनाच्या चांचल्यामुळे कठीण जाते पण सगुणोपासनेच्या अभ्यासाने ते साध्य होते. जन्मजन्मांतरीच्या संवयीमुळे दिसेल तेच सत्य मानायची मनाची फार पुरातन संवय आहे. ती एकाएकी बदलत नसते. आज आत्ता मी जरी तुला सगुणात दिसत असलो तरी मी सगुणही नाही वा निर्गुणही नाही. माझे स्वरूप शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श यांच्या अतीत असे अनादि आहे. ते शब्दांत

सांगता येत नाही. ते ज्याचे त्याला अनुभवावे लागते. जडस्वरूपाचा 'जड व विनाशी प्रत्यय' नाहीसा झाला म्हणजे 'सत्-चित्-आनंद' यांचा प्रत्यय येतो. हा प्रत्यय आला म्हणजे म्हणजे अध्यात्म, अधिभूत, आधिदैव व अधियज्ञ हे सर्व मीच असल्याची अनुभूती येते.

हे ऐकून अर्जुनाने विचारले, 'देवा मला हे सांगा कीं ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, आधिदैव, अधियज्ञ म्हणजे नक्की काय?" भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, "जे पूर्ण आहे, ज्याला जन्म-मृत्यू नाही, जे अक्षय आहे, जे नित्य व परिपूर्ण आहे, दिसत नसले तरी उत्पत्तीचे प्रेरणा स्थान आहे, जे स्थिर आहे ते ब्रह्म. अशा ब्रह्माची निरंतर जाणीव ठेवणे हे अध्यात्म! स्वत: न दिसता ब्रह्म जो आकार निर्माण करते व ज्याच्यामुळे व्यवहार निर्माण होतो ते कर्म. पंचमहाभूतांच्या संसर्गाने जे जडत्व निर्माण होते व नंतर नाश पावते ते अधिभूत. शरीरग्रामांत (म्हणजे शरीरांत) जो चैतन्यपुरुष, ज्याला जीव अशी संज्ञा दिली जाते व जो स्वत:चे शरीर समजून अहंकाराने सुख वा दुःख यांचा अनुभव घेतो ते अधिदैव, जीव जेंव्हा भक्तीने मला शरण येऊन गुरुकृपेने आत्मनिवेदन करतो त्यावेळी अधिदैवाचा म्हणजेच अहंकाराचा उपशम करणारा मी म्हणजे अधियज्ञ. माझे साक्षित्व जीवाला प्रपंच भासवण्यास कारणीभूत होते असे जीवाला वाटते परंतु तसे नसून त्या जीवाच्या अज्ञानभ्रांतीचा तो परिणाम असतो. याच अज्ञानभ्रांतीमुळे कित्येकजण मला मानतच नाहीत. ते असुरी प्रवृत्तीचे असतात. मला त्यांचा वा इतर कोणाचाही द्वेष नाही

अथवा कोणी प्रियही नाही. मी सर्वांच्या बाबतीत सम आहे. तथापि अव्यभिचारी भक्तीने व अनन्यभावाने मला भजणाऱ्यांचे मला सांकडे पडते. मग मी त्यांच्या योगक्षेमाची काळजी घेतो. तसे पहाशील तर माझी भक्ती अगदी सोपी आहे. त्यासाठी माझे अखंड स्मरण करणे, देह आपला नसून माझा असल्याची भावना करणे, माझे सगुण चरित्र वाचणे, सत्कृत्य करून त्याचे कर्तृत्व स्वत:कडे न घेता मला अर्पण करणे. इत्यादी नानाविध मार्गांनी माझी प्राप्ती सहज सोपी होते. अर्जुना सदाचाराने तूं जे करशील, जे भोगशील ते सर्व मला अर्पण कर. त्यायोगे तुला कोणतेही पाप लागणार नाही. अशाप्रकारे जो माझ्या प्रेमांत पडतो त्याच्याच प्रेमांत मी पडतो. अगदी दुराचारी जरी अनन्यभावाने मला शरण आला तर मी त्याला तत्काळ सन्मार्गात आणून माझ्या प्राप्तीचा मार्ग सुगम करून देतो. पूर्व वासना व कल्पना हे या जन्माचे मूळ आहे. तुला जर ह्या जन्म-मृत्युच्या फेऱ्यातून मुक्त व्हावेसे वाटत असेल तर मत्पर हो! माझी भक्ती कर. चित्तात अखंड माझे ध्यान, मनात माझे स्मरण, बुद्धित माझ्या आस्तिक्यभावनेची स्थिरता व अंत:करणांत निर्विकल्पता असा मत्परायण झालास कीं तुला कोणत्याच कर्माचा दोष लागणार नाही. तूं युद्ध करूनही निष्पाप राहशील व अंती मलाच येऊन मिळशील.” भगवान् श्रीकृष्ण इतके सांगून थोडे थांबले.

# श्रीमद्भगवद्गीते विषयी
# लेख ९ वा

अर्जुन म्हणाला, “देवा, हे करण्यासाठी आपल्या विभूतींची स्थाने सांगा म्हणजे विविध प्रकारच्या व्यवहारात आपले अनुसंधान ठेवणे सोपे होईल.” भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, “अर्जुना! अरे, मी आज जरी तुला सगुणात दिसत असलो तरी मी अनादिअनंत, सर्वव्यापी, अजन्मा, जन्म-मृत्युरहित, दृश्यादृश्य विश्वाचा म्हणजेच अखिल ब्रह्मांडाचा स्वामी आहे. हे सर्व दृक् प्रत्ययी व भास्मान् होणारे विश्व म्हणजे लोकालोक पर्वताच्या अलीकडचे व पलीकडचे असे सर्व विश्व म्हणजे अथांग जलाशयावर उमटणाऱ्या तरंगा सारखे आहे. म्हणजेच मी सर्वत्र परीपूर्ण आहे. तर कोणत्या कोणत्या म्हणून विभूती सांगू? तथापि तुझ्या समाधानासाठी काही विभूती सांगतो. ऐक, बुद्धि, ज्ञान, क्षमा, सत्य, मन इत्यादी सूक्ष्म भाव मीच आहे. स्थूलभावांत चंद्र-सूर्य, मरुद्गण, इंद्र, ब्रह्मदेव, विष्णू, शंकर, बृहस्पती, कार्तिकेय, सागर, ॐकार, अश्वत्थ, नारद, चित्ररथ गंधर्व, कामधेनु, कपिल इत्यादी मीच आहे. काल, महिन्यांमधला मार्गशीर्ष, ऋतुंमध्ये वसंत, अशा माझ्या अनेक विभूती आहेत. त्यामुळे त्या कितीही सांगितल्या तरी कमीच होतील. थोडक्यात काय तर संपूर्ण विश्व मी फक्त एका अंशाने व्यापून उरलो आहे. त्यामुळे तूं भेदरहित दृष्टीने माझ्याकडे

पाहायला शिक.” हे ऐकून अर्जुनाच्या मनात आले कीं श्रीकृष्ण जर परब्रह्म आहे तर याचा प्रत्यय येईल असे विश्वरूप दर्शन देण्याची विनंती करावी. त्यामुळे आपल्याला निःशंकपणे श्रीकृष्ण सांगतील त्याप्रमाणे वागण्याचे धैर्य तरी येईल. असा विचार करून अर्जुन भगवान् श्रीकृष्णांना म्हणाला, “देवा! तूं दिलेल्या ज्ञानामुळे माझा आप्तेष्टांबद्दलचा मोह जरी गेला असला तरी तुझे विश्वव्यापित्व काही कळलेले नाही. ते तुझे विश्वव्यापित्व पाहण्याची माझी इच्छा आहे. मी जर त्या योग्यतेचा तुला वाटत असेल तर तेवढा अनुग्रह तूं माझ्यावर कर.” अर्जुनाला चर्मचक्षुंनी ते दिसणार नसल्यामुळे श्रीकृष्णांनी त्याला दिव्यदृष्टी प्रदान करून आपले विश्वरूप प्रकट केले. अर्जुन जेंव्हा त्या दिव्यदृष्टीने ते रूप न्याहाळू लागला तेंव्हा त्याला श्रीकृष्णांना अनंत मस्तके, अनंत मुखे, अनंत हस्त, अनंत पाद व अतिप्रचंड विशाल व तेजस्वी शरीर दिसू लागले. मस्तकावर असलेले गगनचुंबी अगणित मुकुट, सुशोभित तेजस्वी व चंद्रासम शीतल अनेक मुखे. अर्जुन अवाक् होऊन पाहतच राहिला. पाहता पाहता त्याचे लक्ष हळूहळू इतर मुखांकडे जाऊ लागले. दक्षिणे कडील मुखे भयंकर व उग्र दिसत होती. अर्जुन क्षणकाल चरकला. पण धैर्याने पाहू लागला. त्याला त्या मुखांमध्ये कौरव व पांडव यांचे सैन्य वेगाने ओढले जाऊन विक्राळ दाढांखाली चिरडले जात असल्याचे दिसू लागले. त्यांतच द्रोणाचार्य व भीष्मांनाही छिन्न भिन्न होताना पाहून त्याची सहनशीलता संपली. त्याला स्वत:च्या मृत्यूची शंका येऊन त्याने भगवंताला ‘हे काय

दाखवत आहात? मला भिववण्याचा तर आपला हेतू नाही नां?' असे विचारले. भगवान् म्हणाले, नाही माझा हे दाखवण्यामागचा हेतू इतकाच आहे कीं प्रत्यक्षात युद्ध करताना तूं निमित्त मात्र होणार आहेस. सर्व सृष्टीचा उत्पत्तीकर्ता व संव्हारकर्ता जो काल तो कालही मीच आहे. हे मी तुला दिव्यदृष्टी देऊन दाखवीत आहे. अरे देवांनाही अगम्य व अप्राप्त असे हे माझे अपूर्व दर्शन तूं केवळ माझा परमप्रिय व आवडता भक्त आहेस म्हणून तुला निर्भय, निर्वैर होऊन युद्ध करता यावे यासाठी दाखवत आहे." तेंव्हा अर्जुनाने ते उग्र दर्शन असह्य होऊन पुन्हां मूळरूपांत प्रकट होण्याची विनंती केली. भगवान् मूळ रूपांत प्रकट होताच अर्जुनाने श्रीकृष्णांची मनःपूर्वक क्षमा मागितली. अर्जुन म्हणाला, " हे श्रीकृष्णा! तुझे सामर्थ्य व योग्यता न जाणता पूर्वीपासून मी तुझ्याशी थट्टामस्करी करीत आलो. तुझ्याशी प्रत्येक गोष्टीत स्पर्धा करीत आलो. त्याबद्दल मला क्षमा कर! मी तुला मनापासून वंदन करतो." असे म्हणून अर्जुनाने श्रीकृष्णाला वारंवार वंदन केले. तेंव्हा भगवान् श्रीकृष्ण त्याला म्हणाले, "अरे अर्जुना! तूं आणि मी काही वेगळे नाही. तूं माझा परमभक्त म्हणून मी तुला हे विश्वरूप दर्शन दिले आहे. एरव्ही हे रूप वेदाध्ययनाने, तपाने, यज्ञाने अथवा तत्सम कोणत्याही साधनाने दिसणे शक्य नाही. ते फक्त अनन्यभक्तीनेच साध्य होते."



# श्रीमद्भगवद्गीते विषयी
# लेख १० वा

विश्वरूपदर्शन झाल्यावर क्षमायाचना करून अर्जुनाने श्रीकृष्णाला वारंवार वंदन केले. तेंव्हा भगवान् श्रीकृष्ण त्याला म्हणाले, “अरे अर्जुना! तूं आणि मी काही वेगळे नाही. तूं माझा परमभक्त म्हणून मी तुला हे विश्वरूप दर्शन दिले आहे. एरव्ही हे रूप वेदाध्ययनाने, तपाने, यज्ञाने अथवा तत्सम कोणत्याही साधनाने दिसणे शक्य नाही. ते फक्त अनन्यभक्तीनेच साध्य होते.”

हे ऐकून अर्जुनाने विचारले, “हे श्रीकृष्णा! तुझ्या सगुण स्वरूपाची भक्ती श्रेष्ठ कीं निर्गुण विश्वरुपाची भक्ती श्रेष्ठ हे मला समजाऊन सांग!” भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, “अर्जुना! देहधारी मनुष्याला माझ्या सगुण स्वरूपाच्या ठिकाणी मन एकाग्र करणे सोपे असल्यामुळे प्रेमपूर्वक भक्ती करणे सहज शक्य होते. हे तूं स्वत:च्या उदाहरणा वरून समजून घे. देहधारी जीवाला माझ्या अव्यक्त व अतींद्रिय विश्वरूपाची भक्ती अशक्य नसली तरी सहज साध्य नाही. निर्गुणाचे ध्यान कसे करणार? निर्गुणाचे पूजन कसे करणार? जे दिसत नाही, भासत नाही, अनुभवास येत नाही तिथे मन स्थिर कसें करणार? जडदेहाला निर्गुणाचे प्रेम उत्पन्न होणे कठीण असते. सगुणोपासनेत ती अडचण राहात नाही. सगुणोपासनेने माझ्या विषयी प्रेम उत्पन्न होणे

सोपे जाते. प्रेम उत्पन्न होऊन देहधारी जीव मत्पर होऊन सर्व कर्मे मला अर्पण करू लागला कीं मीच त्याच्या चित्तात, मनांत व बुद्धीत स्थिरता उत्पन्न करतो. त्याला फारसे कष्ट पडू न देता त्याला या भवसागरातून पार करतो. मग तसा देहधारी हळूहळू माझ्या निर्गुण सर्वव्यापी स्वरूपाचा अनुभव घेऊ लागतो. देहात असतानाच त्याला निर्विकल्प होऊन माझी प्राप्ती होते. अर्जुना, परमात्मा आपल्या भक्तांसाठीच सगुण स्वरूप धरण करतो. निर्गुण स्वरूपाचे निःसंदिग्ध ज्ञान होण्यासाठी सगुणस्वरूपाला फार महत्व आहे. या स्वरूपाला क्षेत्र व मला क्षेत्रज्ञ असे संबोधले जाते. वेदांतदर्शना खेरीज इतर दर्शनकार त्याला यथार्थ जाणू शकत नाहीत. म्हणून ब्रह्मसूत्र फार महत्वाचे आहे. क्षेत्र हे सविकार आहे. त्यांत प्राणपञ्चक, अंत:करणपञ्चक, विषयपञ्चक, ज्ञानेंद्रियपञ्चक, कर्मेंद्रियपञ्चक, पञ्चमहाभूते व सत्व-रज-तम हे तीन गुण क्षेत्रांत अहंकाराने म्हणजे हा माझा देह ह्या भावनेने कार्यान्वित झालेले असतात. ते क्षेत्रज्ञाच्या ठिकाणी नसतात. आत्मानात्म विवेकाने ते कळते. प्रकृति पासून कार्यरूप पदार्थ होतात. तर पुरुष हा साक्षीरूपाने कार्य-कारण-रुपादीच्या प्रभावाने उत्पन्न झलेल्या गुणांचा भोग घेतो. प्रकृतीमुळे उत्पन्न झालेला गुणसंग अहंकारी जीवाला बऱ्यावाईट जन्मास कारणीभूत होतो. पुरुष निःसंग असतो. याचा अर्थ क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगामुळे जड व चैतन्यरूप सृष्टी निर्माण होते. त्यांत अनंत प्रकारे क्षेत्रभिन्नता आहे पण क्षेत्रज्ञ एकच आहे. क्षेत्रज्ञ म्हणजे

आत्मतत्त्व जे सर्वत्र सदा सम व अविनाशी आहे. प्रकृतीला तसे स्वतंत्र अस्तित्व नाही. हे दृढनिश्चयाने जाणता आले कीं परमपद प्राप्त होते. आतां तूं म्हणशील कीं निःसंग आत्म्याला संग कसा होतो. क्षेत्र-क्षेत्रज्ञ म्हणजे काय? गुण म्हणजे काय किती व त्यांचा बंध कसा? शिवाय पुरुष गुणातीत कसा? तो कोणत्या लक्षणांनी जाणावा? इत्यादी प्रश्न तुझ्या मनांत उत्पन्न होणे अगदी स्वाभाविक आहे. तर काना-मनाला एक करून ऐक. आत्मतत्त्व हे सर्वव्यापी अखंड असल्याने क्षेत्र त्यापासून म्हणजे क्षेत्रज्ञापासून भिन्न नाही. समुद्र व त्यावरचे तरंग जसे भिन्न नसले तरी त्या तरंगांना आपण तरंगच म्हणतो समुद्र नाही. तसेच हे आहे. समुद्रावरच तरंग व लाटा उत्पन्न होतात व त्यातच विलय पावतात. तसेच हे विश्व भासमान होणारे व क्षेत्रज्ञात विलीन होणारे आहे. जे शाश्वत नाही पण दिसते व भासते ते सर्व क्षेत्र, जे शाश्वत असून दिसत जरी नसले तरी सर्वाचे चैतन्य ते क्षेत्रज्ञ असे समज. गुण म्हणशील तर ते सत्व, रज व तम. अज्ञान व विक्षेप यामुळे क्षेत्र स्वत:ला माझ्या पासून म्हणजे क्षेत्रज्ञापासून भिन्न समजू लागते. त्यामुळे गुणांचा बंध निर्माण होतो. आता गुणातीताचे लक्षण ऐक. आत्मानात्मविवेकाने परब्रह्माला जाणून प्राक्कर्माचा द्वेष न करता प्रारब्धभोग भोगताना माझ्या स्मरणात राहून सुख-दुःखादि समान मानणारा तो गुणातीत. मान-अपमान, सुख-दुःख, संतोष-खेद, प्रिय-अप्रिय, पाप-पुण्य, निंदा-स्तुती इत्यादी कोणत्याही प्रकारच्या द्वंद्वाची बाधा न होता माझ्या स्मरणात विक्षेप उत्पन्न होऊ न देता कर्म

करणारा गुणातीत असतो. त्याला स्वत:च्या इच्छा नसतात पण माझ्यासाठी तो सर्व विहित कर्मे तत्परतेने करीत असतो. तो गुणातीत व आत्मज्ञानी असतो.



# श्रीमद्भगवद्गीते विषयी

# लेख ११ वा

अर्जुना वैराग्याखेरीज चित्तांत आत्मज्ञान दृढ होऊ शकत नाही. वैराग्य म्हणजे संसाराची अनित्यता स्मरणात ठेऊन 'मी आणि माझे' याचा पूर्ण त्याग करून सतत आत्मानात्म विवेकात राहणे. संसाराचा वृक्ष उलटा आहे. अश्वत्थ म्हणजे जे अशाश्वत आहे तो हा संसार. जे दिसते भासते ते कालांतराने नासते. ह्या अशाश्वत संसाराचेमूळ माया. अर्जुना! श्व: म्हणजे क्षणोक्षणी बदलणारा! म्हणून अश्वत्थाचे हे रूपक आहे. मायेचे महत्तत्व वर आणि त्रिगुणात्मक वासनांच्या फांद्या खाली आहेत. वासनांचेमूळ मायेत आहे म्हणून मुळावर घाव घालण्यासाठी ज्ञानरूप खड्ग वापरावे लागते. ज्ञानाला पोषक दैवी संपत्ती म्हणजे सत्वगुणातील सत्य, तप, दया व पावित्र्य हे मुख्य. त्याला पोषक क्षमा, शांती, सरलता, आमनित्व, अदंभ, विरक्ती, निर्भयत्व, अध्ययनाची आवड, कायिक-वाचिक-मानसिक अहिंसा इत्यादींची आवश्यकता असते. याला मारक असते ती असुरी संपत्ती. त्याग कसला करायचे ते समजण्यासाठी ऐकून ठेव. दंभ, मानीपणा, गर्व, ताठा, अहंकार, क्रोध, पैशुन्य (म्हणजे चहाडी-चुगली करण्याची वृत्ती), स्वार्थ, हाव इत्यादी तमोगुण आहेत. त्यातही काम-क्रोध-लोभ हे त्रिगुण म्हणजे नरकाचे द्वारच समज. अर्जुना तूं दैवी संपत्ती घेऊन जन्माला आलेला आहेस. त्यामुळे धर्मशास्त्र प्रमाण

मानून त्याप्रमाणे वर्तन कर. शास्त्रविहित नसलेले व स्वत:च्या स्वार्थी सोयीने विषयसुखासाठी केलेले वर्तन इह व पर अधोगतीला कारण होते.”

अर्जुनाने विचारले, “देवा मग शास्त्रविधीला सोडून केलेले तुझे यजन सात्विक राजस कीं तामस?” श्रीभगवान् म्हणाले, “अर्जुना, जीवाकडून कोणतेही कर्म श्रद्धे शिवाय घडत नसते. रजोगुणी व तमोगुणी श्रद्धा अध:पतनाला कारण होतात. सात्विक श्रद्धावान् पण शास्त्रविधी न जाणणारा व सात्विक आहार विहार करणारा माझे यजन करील तर तेही फलदायी होते. निरपेक्ष, निःस्वार्थी, अहंकार नसलेला, माझ्याविषयी आस्था असलेला सदाचरणी म्हणजे सात्विक. तप म्हणजे निःस्वार्थ बुद्धीची माझ्या स्मरणात सतत जोपासना करणे. प्रत्युपकाराची अपेक्षा न ठेवता तसेच दान करतो ही भावनाही न ठेवता केलेले दान म्हणजे सात्विक दान. त्यामुळे सात्विक कर्म हे ईशस्मरणात ब्रह्मार्पण करण्याच्या क्रियेमुळे तप व पावित्र्य उत्पन्न होऊन इह-पर कल्याण साधून मोक्ष देणारे असते.” अर्जुन म्हणाला, “देवा आता एक गोष्ट मला समजावून सांगा कीं त्याग आणि संन्यास यात काय फरक आहे? शास्त्रविधीत सर्वकर्म हे विधी निषेधासह प्रतिपादन केले आहे. संन्यासाचे सुद्धा अनेक नियम आहेत. मतमतांतरांच्या गलक्यात पूर्वीच्या श्रवणाचा गोंधळही डोक्यात आहेच. त्यामुळे तो दूर व्हावा हीच नम्र प्रार्थना आहे. ” भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, “ अर्जुना, अरे संन्यास आणि त्याग यातला गर्भित

अर्थ सांगतो. गुरुंकडून दीक्षाप्राप्त साधक घर कुटुंब यांच्यासह नियतकर्माचा त्याग करून जीवन ब्रह्मार्पण करण्याच्या प्रक्रियेत येतो. असा साधक बाह्यत: संन्यासी दिसत असला तरी संसार मोहातून निवृत्त झालेला नसेल तर तो खरा संन्यासी नाही. गृहादिकांच्या विषयी जरी विरक्ती असली आणि पंचविषयातल्या कोणत्याही रुचीबाबत जर विरक्ती नसली तरी तो सदोष असतो. पंच विषय पूर्ण त्यागून तसेच आपण विषय त्याग केला हि भावनाही मनात न ठेवता जो मत्परायण होतो तो खरा संन्यासी. म्हणजे अपरिग्रह मुख्य. अपरिग्रह म्हणजे माझ्या शिवाय काहीच नको असणे. माझ्या स्मरणांत देहधारणे पुरता व्यवहार करून प्रारब्धवशात् जे प्राप्त होईल त्यात संतुष्ट असणे. काया क्लेशाच्या भयाने केलेला त्याग म्हणजे राजस त्याग. मोहावशतेने केलेला त्याग तामस.

अर्जुना! बुद्धीमान्, शुभाशुभाचा द्वेष न करणारा, फलापेक्षा न ठेवता आस्तिक्यबुद्धीने केवळ कर्तव्य म्हणून कर्म करणारा खरा त्यागी असतो. कर्मफळाचा त्याग हा संपूर्ण मानसिक असतो. म्हणजे आपण कर्म केले असा अभिमान त्याला नसतो. मी व माझे ही धरणाच लोप पावलेली असली तरच ते घडते. कर्मफलाचा त्याग न करणाऱ्याला बऱ्या-वाईट कर्माचे फळ भोगावच लागते. कर्म उत्पन्न होणारी सांख्यशास्त्रांत जी पांच कारणे सांगितली आहेत ती ऐक. अधिष्ठान म्हणजे देह, कर्ता म्हणजे जीव, करण म्हणजे कर्म, पृथक्चेष्टा म्हणजे विविध क्रिया व पांचवे दैव. शरीर, मन, वाणी, न्याय्य वा

अन्याय्य कृती व हेतू हे पांच. कर्माचे प्रेरक तीन. पहिले ते ज्ञान म्हणजे जीवाला जे समजते ते. दुसरे म्हणजे ज्या वस्तूचे ज्ञान होते ती वस्तू. तिसरे म्हणजे परिज्ञाता म्हणजे जाणणारा. कर्माची अंगे तीन. पहिले अंग कर्ता, दुसरे कारण व तिसरे क्रिया! ज्ञान, कर्ता व कर्म यांचेही सात्विक, राजस व तामस असे तीन भेद आहेत. समदृष्टीचे ज्ञान सात्विक, भेददृष्टीचे ज्ञान राजस व स्वार्थबुद्धीचे ज्ञान तामस. विधियुक्त नियतकर्म प्रीती वा द्वेष न ठेवता कर्तव्यभावनेने निरहंकार वृत्तीने कर्म करणारा सात्विक कर्ता. 'मी'पणाने व फलापेक्षा ठेवून कर्म करणारा राजस कर्ता! परिणामाचा विचार न करता स्वार्थबुद्धीने स्वसामर्थ्याच्या जोरावर केलेले अन्याय्य कर्म करणारा तो तामसकर्ता!

अर्जुना थोडक्यात म्हणजे अहंकार रहित, निःस्वार्थबुद्धीने, निरपेक्षवृत्तीने व कर्तव्यतत्परतेने जो सर्व कर्मे ब्रह्मार्पण करतो तो देहत्यागानंतर कोणत्याच कर्मबंधनात अडकत नाही. ब्रह्म-ईश्वर-आत्मतत्त्व हे जरी वेगळे नसले तरी काल, कर्म व स्वभाव यांच्या माध्यमातून कार्य घडतच असते. ब्रह्मच ईश्वराच्या रूपाने सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत वास करून आत्मतत्त्वाच्या माध्यमातून चैतन्य उत्पन्न करून शरीर चालवते. आत्मतत्त्वच शरीरभावाच्या आवश्यक गोष्टी जाणू शकते. म्हणून गुणकर्म विभागने स्वधर्म हा स्वभाव होतो. त्यामुळेच शरीर प्रकृती स्वभावाच्या माध्यमातून कार्यान्वित होते. जर तूं माझ्या स्मरणात असशील तर बुद्धी जो निर्णय देईल तो माझा निर्णय असेल व जर तूं अहंकाराने निर्णय घेशील तर तो प्रारब्धभोग असेल.

त्यामुळें माझ्या स्मरणात तूं जर युद्ध करशील तर तुला कोणतेही पाप लागणार नाही. पण जर तूं अहंकाराने मी युद्धच करणार नाही असे म्हणशील तर प्रकृती तुझ्याकडून ते करवून तर घेईलच पण वर पापाचा धनी होशील. तूं माझा परमप्रिय भक्त असल्यामुळे मी हे गुह्य ज्ञान तुला सांगितले आहे. आतां तुझा तूं नीट विचार करून तुला जे योग्य वाटेल ते तूं कर. अर्जुना अरे! माझ्या भक्ताने जरी आपला हा संवाद श्रवण करून मनन केले तर तो सुद्धा उद्धरून जाईल. इतकेच नाही तर तो मला प्रिय होईल." हे ऐकून अर्जुन भगवान् श्रीकृष्णांना नमस्कार करून म्हणाला " हे देवाधिदेवा, मी अगदी निःशंक व निःसंदेह झालो आहे. तूं सांगशील तेच मी आता करणार आहे." हे बोलता बोलता अर्जुनाचे नेत्र पाणावले, कण्ठ सद्गद झाला. कपाळावर घर्मविंदू जमा झाले. अंगावर रोमांच उभे राहिले. थोडक्यात म्हणजे अर्जुनाचे अष्टसात्विक भाव जागे झाले. त्याची भावसमाधीच लागली. त्याला भानावर आणण्यासाठी भगवंताने त्याला आलिंगन देऊन उठवले. तत्क्षणी भानावर आलेला अर्जुन युद्धासाठी सज्ज झाला.

# श्रीमद्भगवद्गीते विषयी
# लेख १२ वा

अर्जुन भगवंतांच्या उपदेशा नंतर युद्धास उभा राहिला. त्याला आनंद झाला वगैरे वर्णन गीतेत आलेले आहे. आता हा उपदेश झाल्या नंतर युद्ध सुरु झाले. असे महाभारत सांगते. कारण त्यावेळे पर्यंत सूर्योदय झालेला नव्हता. सूर्योदय होण्या पूर्वीच हा संवाद झाला. त्यात संजय उवाच, येत नाही. अकरावा अध्याय येत नाही. कारण तो भगवंताच्या लीलेतला व काळाचा संकोच करून केलेला प्रकार होता. युद्ध भूमीवर इतर कोणालाही ते समजलेले नाही. सांगण्याचा हेतू असा कीं ह्या सगळ्या संवादाला फार फार तर अर्धातास लागलेला आहे. तेवढा वेळ त्यांना सहजच मिळाला आहे. कारण युद्धाची जी आचार संहिता ठरली होती त्यांत दोन्ही बाजूंनी सरसेनापती जोवर विशेष अनुमती देत नाहीत तो वर युद्ध सुरूच होणार नव्हते. हा एक भाग दुसरे असे कीं गीतेत ग्रथित केलेले अर्जुनाचे श्लोक फक्त ८४ आहेत व श्रीकृष्णाचे श्लोक ५८४ आहेत. गीतेत एकूण ७१० श्लोक आहेत. माझ्या सारख्या सामान्य मनुष्याला गीता वाचायला १ तास पुरतो. म्हणजे एक श्लोक ५.०७ सेकंदात वाचून होतो. त्यामुळे ५८४+८४= ६६८ श्लोक ५७ मिनिटात वाचून होणार. भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुन याचा हा संवाद आहे त्यामुळे

तेवढा वेळ तर त्यांना नक्कीच मिळाला असणार. असो सांगण्याचे तात्पर्य काय कीं गीता रणांगणावर सांगितली गेली. प्रश्न विचारणारा बुद्धिमान् अर्जुन होता व उत्तर देणारे साक्षात् परब्रह्म होते. त्यामुळे खूपच कमी वेळ लागला असणार. युद्ध सुरु झाले त्यावेळी धृतराष्ट्र विजयाच्या धुंदीत होता. पण जेंव्हा भीष्म रणांगणावर पडल्याचे त्याला समजले तेंव्हा त्याला अशी गरज भासली कीं हे काय व कसे घडले म्हणून त्याने संजयाला पाचारण करून उद्वेगाने विचारले, " धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे ....." हा पहिला श्लोक येतो. मग संजय सांगायला सुरुवात करतो. ज्ञानेश्वर महाराजंनी ज्ञानेश्वरीत अठराव्या अध्यायात "म्हणौनि श्रीव्यासांचा हा थोरु| विश्वा जाला उपकारु| जे श्रीकृष्ण उक्ती आकारु| ग्रंथाचा केला ||१७०८||" असा उल्लेख केला आहे. कारण हे सगळे व्यासांच्यामुळे घडले आहे. त्यांनी संजयाला दिव्यदृष्टी दिली होती. संजयाने ती हकीकत एकादशीला धृतराष्ट्राला सांगितली ती व्यासांनी ग्रथित केली. त्यामुळे उपरोक्त सर्व लेखांमध्ये गीतेचा भावार्थ घेऊन संवाद लिहिलेला आहे. माझ्या सारख्या अप्रबुद्ध मनुष्याने ते लिहिले आहे. उद्देश आपल्या धर्मग्रंथाची माहिती व्हावी हा आहे. त्यातून ज्ञानेश्वर महाराज कीं जे प्रत्यक्ष मानवीरुपात अवतरलेले परब्रह्म ते स्वत: असे म्हणतात "या गीतार्थाची थोरी| स्वयें शंभू विवरी| जेथ भवानी प्रश्नु करी| चमत्कारौनि ||७०|| तेथ हरु म्हणे नेणिजे| देवी जैसें कां स्वरूप तुझें| तैसें हें नित्य नूतन देखिजे| गीतातत्व ||७१||हा वेदार्थ सागरु| जया निद्रिताचा घोरु| तो स्वयें सर्वेश्वरु| प्रत्यक्ष अनुवादला ||७२

|| ऐसे जें अगाध| जेथ वेडावती वेद| तेथ अल्प मी मतिमंद| काई होये ||७३|| परी एथ असे एकु आधारु| तेणेंचि बोले मी सधरु| जे सानुकूळ श्रीगुरु| ज्ञानदेवो म्हणे ||७५||” त्यामुळे माझ्या सारखा य:कश्चित् मनुष्य काय लिहू शकणार? पण सद्गुरुंच्या आधारेच मीही हा खारीचा वाटा उचलण्याचा प्रयत्न केला आहे.

आपण सर्वांनी मन:पूर्वक वाचले. ह्याचा आनंद आहे. जमेल तितका गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. पण मानवी त्रुटी राहू शकतात. त्यामुळे लेखनात कुठे कमी जास्त आढळल्यास क्षमा करावी. काही सूचना असल्यास कृपया निःसंकोच लिहाव्या ही विनंती

~~~लेखन सीमा ~~~~


~~~

# प्रकाशकाचे दोन शब्द

२०१६ हे वर्ष ई साहित्यासाठी फ़ारच उत्साहाने सुरू झाले. या वर्षाची सुरुवातच मुळी लिओ टॉलस्टॉय, पॉल ब्रन्टन, आणि मनुस्मृतीने होत आहे. धर्माकडे पहाण्याचे तीन विविध दृष्टीकोन यांत आहेत. २०१५ मध्ये ई साहित्य मधून संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, संत नामदेव, संत बहिणावाई, संत कान्होपात्रा, संत चोखामेळा, गीतारहस्य, भगवद्गीता, अशा अनेक मौल्यवान ग्रंथांची ई निर्मिती करण्याचा योग आला. २०१६ ची सुरुवात बायबल, मनुस्मृती पासून झाली आणि त्यात कुराण, बौद्धमत, जैनधर्म, ज्यू, पारशी, वेद, उपनिषदे अशा विविध धर्मशास्त्रांची भर पडावी असा योग दिसतो आहे. योग दिसतो असे यासाठी म्हणतो की ही पुस्तके गेल्यावर्षीही आम्ही कुठे मुद्दाम शोधायला गेलो नव्हतो. श्री विजय पांढरे,

डॉ. श्री अशोक धांडे, श्री अविनाश नगरकर, श्री अरुण फ़डके, श्री रत्नाकर महाजन, श्री फ़्रान्सिस आल्मेडा, श्री मधुकर सोनावणे, श्री अशोक कोठारे, श्री अरुण काकतकर या व इतर अनेक विद्वानांनी हे साहित्य मोठ्या विश्वासाने आमच्या हाती सोपवलं. आणि आम्ही फ़क्त पोस्टमनगिरी केली. आमच्या सुदैवाने प्रचंड मोठ्या वाचकवर्गाने या साहित्याचा आस्वाद घेतला. या महानुभावांच्या श्रमाचे काही प्रमाणात चीज झाले.

ई साहित्य प्रतिष्ठान निर्माण झाले नवीन साहित्यिकांसाठी एक व्यासपीठ म्हणून. ते तसेच आहे. आणि तसेच राहील. साधारण ८० टक्के पुस्तकं ही नवसाहित्यिकांचीच असतील. पण सुमारे वीस टक्के पुस्तकं नावाजलेली, वाचकप्रियही असावीत. म्हणजे वाचकांचा ओघ वाढता आणि वाहता रहातो.

मराठीतल्या महान प्रकाशकांच्या तुलनेत ई साहित्य अगदीच नगण्य आहे. आणि त्यांच्याशी तुलना वा स्पर्धा करण्याचा मानसही नाही. परंतू दर्जाच्या बाबतीत मात्र आम्ही तोडीस तोड राहू. हे वर्ष अत्यंत दर्जेदार कथा, कादंबर्‍या आणि काव्य-विनोद-शास्त्र पुस्तकांचे असेल याची आम्ही ग्वाही देतो.

आपण या साहित्य यज्ञात यथाशक्ती इंधन पुरवावे ही विनंती. आपल्या ओळखीच्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आमच्याकडे पाठवा. आम्ही तुम्हाला आमचे VIP सभासद करू. याशिवाय या कामात इतर अनेक तर्‍हांनी आपण सहभागी होऊ शकता. वेबसाईटला भेट तर देतच रहा. खंबीरपणे पाठीशी उभे रहा. मग बघाच काय काय चमत्कार घडतील ते.

आपले विश्वासू

टीम ई साहित्य

